सन २०१५-१६ या वर्षाकरीता महसूल विभागासाठी महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas (KRAs)] निश्चित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण २०१५/प्र. क्र. ६६/म-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २ सप्टेंबर, २०१५.

## प रि प त्र क

राज्यातील महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम, गतिमान व पारदर्शक करणे व महसूली उत्पन्नात वाढ करुन राज्याचा विकासाचा मार्ग प्रशस्त करण्याकरीता सन २०१५-१६ करीता महसूल विभागासाठी महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas (KRAs)] निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत विचारांती सन २०१५-१६ या वर्षात आतापर्यंत घेण्यात आलेले महत्वपूर्ण निर्णय व उर्वरित कालावधीत संकल्पित बाबी यांचा साकल्याने विचार करुन वर्ष २०१५-१६ करीता महसूल विभागासाठी महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas (KRAs)] पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अभियान | महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे | अंमलबजावणीचा स्तर |
|---|---|---|---|
| १ | भूमी अभिलेख अद्यावतीकरण व सुलभीकरण करणे व ई-महाभूमी कार्यक्रम प्रभावीपणे राबविणे. | • ई- फेरफार -<br>दि. ०१.०८.२०१५ पासुन राज्यात, ई-फेरफार सुरु करुन ३१ मार्च, २०१६ पर्यंत ई-फेरफार सुविधा प्रत्येक गावात उपलब्ध करुन देणे<br>• ई-अभिलेख -<br>महसूल अभिलेख्यांचे स्कॅनिंग खाजगी संस्थांमार्फत ३१ मार्च, २०१६ पर्यंत पूर्ण करणे. | - सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br>- जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख |
| २. | शासकीय जमिनीचा इष्टतम वापर करणे- | • शासकीय जमिनीच्या भाडेपट्टयांच्या नूतनीकरणाचे सुधारित धोरण विहित करणे<br>• सरकारी जमीन शासकीय कामांसाठी/प्रकल्पांसाठी प्रदान करण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना देण्यासाठी नियमात आवश्यक सुधारणा करणे. | - शासन |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | महसूल उत्पन्न वाढीच्या दृष्टीने कृती-कार्यक्रम राबविणे- | • महालेखापालांकडून प्राप्त जमालेखा परिच्छेदांचा मोहिमेच्या स्वरुपात निपटारा करणे.<br><br>• महसूल विभागाच्या नियंत्रणा खालील विविध शुल्क/फी /दंड दरात सुधारणा करणे.<br><br>• गौण खनिजाच्या स्वामित्व धनाच्या दरात सुधारणा करणे.<br>• करमणूक शुल्क वसुलीसाठी व या संदर्भातील कामकाजाबाबत सुसूत्रिकरणासाठी अधिनियमात व कार्यपध्दतीत सुधारणा करणे आणि करमणूक शुल्काशी निगडीत संपूर्ण कार्यपध्दतीसाठी संगणक प्रणालीचा वापर सुरु करणे<br>• शासकीय जमिनीवरील इमारतींच्या पुनर्विकासाचे धोरण निश्चित करणे. | - सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br>- जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख<br>- शासन<br><br>- विभागीय आयुक्त, कोंकण<br>- शासन<br><br>- शासन<br><br>- शासन<br>- सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br><br>- शासन |
| ४ | महसूल बाबीं विषयक अर्ध न्यायिक कामकाज गतिमान करणे | • महसूल अधिकाऱ्यांकडे ६ महिनेपेक्षा जास्त काळ प्रलंबित असलेली सर्व प्रकरणे डिसेंबर, २०१६ पर्यंत अंतिम निर्णय देवून निकाली काढणे. | - सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br>- जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख |

| | | | |
|---|---|---|---|
| | | • अर्धन्यायिक कामकाजाचे प्रभावी संनियंत्रण करण्यासाठी संगणक आज्ञावली राज्यात लागू करणे. | - सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br>- जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख<br>- शासन |
| | | • अर्धन्यायिक कामकाजांतर्गत अपिल / पुनरीक्षण प्रकरणे निकालात काढणेबाबत कालमर्यादा विहित करण्याच्या दृष्टीने कायद्यात सुधारणा करणे. | - शासन |
| ५ | उद्योगधंद्यास प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीने महसूल प्रशासनांतर्गत प्रक्रिया/कार्यपध्दतीचे सुलभीकरण - उद्योग व्यवसाय सुगमता | • महाराष्ट्र जमीन महसूल संहितेतील कलम ४४-अ नुसार खऱ्याखुऱ्या औद्योगिक प्रयोजनाकरिता अकृषिक वापर करण्याच्या प्रवृत्तीमध्ये वाढ करण्याच्या दृष्टीने अकृषिक वापर करण्याकरिता प्रमाणित खात्रीशीर माहिती अर्जदारास प्राप्त होणेसाठी जिल्हा स्तरावर सुलभीकरण समिती(Facilitation Committee) गठीत करणे. | - शासन |
| | | • महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील कलम ४४- अ मध्ये अकृषिक वापरासंदर्भात सनद देण्याकरीता कमाल कालावधी विहीत करण्यासाठी सुधारणा करणे. | - शासन |

| | | | |
|---|---|---|---|
| | | • अकृषिक वापरासाठी उद्योजकांनी कृषिक जमीनी विकत घेण्याकरीता महाराष्ट्र कुळ वहिवाट व शेतजमीन अधिनियम अंतर्गत अवलंबावयाच्या कार्यपध्दतीचे सुलभीकरण करणे. | - शासन |
| ६ | महसूल प्रशासनाच्या कायद्यातील संरचनेत व धोरणात कालानुरुप सुधारणा करुन त्यास अधिक प्रभावी स्वरुप देणे- | • महाराष्ट्र कुळ वहिवाट व शेतजमीन अधिनियमाच्या कलम ६३, ६३-१ अ आणि ८४ क मध्ये दुरुस्ती करणे.<br>• महाराष्ट्रातील धारण जमिनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करणे व एकत्रिकरण अधिनियमाच्या कलम ७, ८ व ८ अ अ मधील तरतूदी विकास आराखडा आणि प्रादेशिक आराखडा या मधील निवासी, वाणिज्यिक अथवा अन्य अकृषिक वापरासाठीच्या जमिनीला लागू नसण्याविषयी तरतूद सदर कायद्यात अंतर्भूत करणे आणी त्याच धर्तीवर महाराष्ट्र शेत जमीन (धारणेची कमाल मर्यादा) अधिनियम, १९६१ या खालील कलम ४७ (१) मध्ये सुधारणा करणे.<br>• राज्यातील उर्वरीत भागातील इनाम/वतन निर्मूलन विषयक तरतूदी मराठवाडयात लागू करण्याच्या दृष्टीने हैद्राबाद इनाम निर्मूलन व रोख अनुदाने रद्द करण्याबाबत अधिनियम, १९५४ मध्ये सुधारणा करणे.<br>• महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ च्या कलम ४८ (८) मध्ये | - शासन<br>- शासन<br>- शासन<br>- शासन |

| | | | |
|---|---|---|---|
| | | सुधारणा करुन गौण खनिजाच्या अनधिकृत वाहतूक व उत्खननासाठी वापरण्यात येणारी वाहने व उपकरणे जप्तीबाबत तरतूद करणे.<br>● सहकारी गृहनिर्माण संस्थांना शासकीय जमीन प्रदानाच्या प्रचलित धोरणात सुधारणा करणे.<br>● आदिवासी व्यक्तींच्या जमिनींच्या हस्तांतरणाबाबत नियुक्त समितीचा अहवाल प्राप्त व स्वीकृत झाल्यानंतर त्या अनुषंगाने विविध कायद्यात तद्नुषंगिक सुधारणा करणे. | - शासन<br><br>- शासन |
| ७ | मालमत्ता हक्क प्रमाणीकरण प्रणाली राबविणे | ● राज्यात उद्योग व्यवसायास चालना देण्याच्या हेतूने “मालमत्ता हक्क प्रमाणीकरण प्रणाली” राबविण्यासाठी आवश्यक वैधानिक बदल व संरचनात्मक बदल करण्यासंदर्भात निर्णय घेणे. | - शासन |
| ८ | महा-राजस्व अभियान राबविणे - | ● शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक मराअ २०१५/प्र.क्र.११०/म-५, दि. २९ जुलै, २०१५ नुसार महाराजस्व अभियान प्रभावीपणे राबविण्याविषयी कार्यवाही करणे. | - सर्व विभागीय आयुक्त<br>- सर्व जिल्हाधिकारी<br>- जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख |
| ९ | महसूल यंत्रणेच्या सक्षमीकरणासाठी उपाययोजना करणे - | ● महसूल विभागांतर्गत सर्व संवर्गांसाठी प्रशिक्षण आराखडा तयार करणे.<br><br>● सद्यस्थितीत कामाचे प्रमाण व संगणक प्रणालीच्या वापराच्या अनुषंगाने जिल्हा/ उपविभाग/ तालुका स्तरावरील महसूल | - विभागीय आयुक्त, नागपूर<br>- शासन<br><br>- विभागीय आयुक्त, औरंगाबाद<br>- शासन |

| | | | |
|---|---|---|---|
| | | कार्यालयांच्या अधिकारी/कर्मचारी यांच्या पदांच्या आकृतीबंधाचे पुनर्विलोकन करुन सुधारित आकृतीबंध तयार करणे. | |
| १० | गौण खनिज (विशेषत: वाळू) उत्खननासाठी सर्वंकष धोरण अंमलात आणणे | • वाळू तस्करी हा M.P.D.A. ॲक्ट अंतर्गत गुन्हा ठरविण्याच्या दृष्टीने कायद्यात आवश्यक सुधारणा करणे.<br>• गौण खनिजांशी निगडीत संपूर्ण कार्यपध्दतीसाठी संगणक प्रणालीचा वापर करणे व सुधारित कार्यपध्दती निश्चित करणे. | - शासन<br>- शासन |
| ११ | एकात्मिक कार्यक्षम व पारदर्शक महसूल प्रशासनासाठी समांतर समन्वय (हॉरीझॉन्टल इंटिग्रेशन) साधणे | • महसूल प्रशासनाचे पुढील ५ वर्षासाठी व्हिजन डॉक्युमेंट तयार करणे.<br>सदर व्हिजन डॉक्युमेंट अंतर्गत -<br>अ) नोंदणी महानिरीक्षक, जमाबंदी आयुक्त व महसूल प्रशासनाच्या समन्वयार्थ आवश्यक उपाययोजना सुचविण्यासाठी सल्लागाराची नेमणूक करणे.<br>ब) भविष्यातील ५ वर्षाचा ई-गव्हर्नन्सचा आराखडा तयार करणे<br>क) एन.ई.जी.पी. च्या मार्गदर्शक सूत्रानुसार अंतर्भूत असलेल्या ई-गव्हर्नन्सच्या मिशन मोड प्रकल्पातील, एन.एल.आर.एम.पी., ई-डिस्ट्रीक्ट व शासनाच्या नोंदणी महानिरीक्षक कार्यालयातील संगणक प्रणालीचा समन्वय याबाबत रोड मॅप व अंमलबजावणीबाबत मुदतीसहीत वेळापत्रक तयार करुन त्याचे काटेकोर पालन करणे. | - शासन |

उपरोक्त मुद्यांच्या अनुषंगाने महसूल विभागातील तसेच क्षेत्रीय स्तरावरील सर्व सबंधित अधिकाऱ्यांनी सदर महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas] यांच्या अंमलबजावणीबाबत काटेकोरपणे कार्यवाही व अंमलबजावणी करण्याची व्यक्तिश: दक्षता घ्यावी.

३. राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांनी वरील दिशानिर्देशांप्रमाणे सदर महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas (KRAs)] यांच्यापैकी क्षेत्रीय कार्यालयांशी निगडीत बाबींसंदर्भात आपआपल्या जिल्हयांमध्ये प्रभावीपणे अंमलबजावणीसाठी सर्वतोपरी प्रयत्न करावेत आणि अशा महत्वाच्या फलनिष्पत्ती क्षेत्रांच्या अंमलबजावणीचा आढावा घेवून त्याबाबतचा मासिक प्रगती अहवाल सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी विभागीय आयुक्त यांना सादर करावा आणि विभागीय आयुक्त यांनी अशा महत्वाच्या फलनिष्पत्ती क्षेत्रांच्या अंमलबजावणीचा नियमितपणे आढावा घेवून तिमाही प्रगती अहवाल शासनास सादर करावा. त्याचप्रमाणे जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्वतंत्रपणे सदर महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे [Key Result Areas (KRAs)] या अंतर्गत त्यांच्याशी निगडीत मुद्दयांसंदर्भात अधिनस्त कार्यालयात होणा-या कार्यवाहीचा आढावा घेवून तिमाही प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१५०९०२१२३५१०५७१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2015.09.02 19:13:49 +05'30'

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
प्रधान सचिव (महसूल)

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

२. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

३. सर्व जिल्हयांचे मा. पालकमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ३२,

६. सचिव (वने), मंत्रालय, मुंबई - ३२,

७. सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई - ३२,

८. सर्व जिल्हयांचे पालक सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

९. सर्व विभागीय आयुक्त

१०. जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे

११. सर्व जिल्हाधिकारी

१२. प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

१३. सर्व सह सचिव व सर्व उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,

१४. कार्यासन म-८ (निवड नस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.